दिनांक २६ नोव्हेंबर “संविधान दिन”
म्हणून साजरा करण्याबाबत .
भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती निमित्त आयोजित कार्यक्रम.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः सान्यावि-२०१५/प्र.क्र.३५७/बांधकामे

कक्ष क्र.१४०, पहिला मजला, मंत्रालय विस्तार,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु मार्ग
मुंबई- ४०० ०३२
तारीख: ६ नोव्हेंबर,२०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. सान्यावि-२०१५/प्र.क्र.१६३/ बांधकामे, दिनांक ९ऑक्टोंबर,२०१५**

२) **मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्या दालनात आयोजित दिनांक ३नोव्हेंबर,२०१५ रोजीची करण्यात आलेली बैठक**

शासन परिपत्रक :-

१. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ वे जयंती वर्ष हे “समता व सामाजिक न्याय वर्ष” म्हणून साजरे करण्याचा निर्णय दिनांक ९ ऑक्टोबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला असून, त्या अंतर्गत राज्यात विविध कार्यक्रम / उपक्रम राबविण्यात येत आहेत.

२. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीचे औचित्य साधून दि. २६ नोव्हेंबर, २०१५ हा दिवस “संविधान दिन” म्हणून राज्यामध्ये मोठ्या प्रमाणावर साजरा करावयाचा आहे. या संदर्भात मा. मंत्री, सामाजिक न्याय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३ नोव्हेंबर, २०१५ रोजी सर्व संबंधितांची बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहू बैठकीमध्ये मा. मंत्री, सामाजिक न्याय यांनी दिलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने दिनांक २६ नोव्हेंबर हा दिवस राज्यात “संविधान दिन” म्हणून साजरा करण्याबाबत सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी :-

३. केंद्र शासनाने दिनांक २६ नोव्हेंबर हा दिवस "संविधान दिन" म्हणून संपूर्ण देशामध्ये साजरा करावयाचे घोषित केलेले असून, त्या अनुषंगाने सदर कार्यक्रम राज्यात मोठ्या प्रमाणात राबविण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने राज्यातील सर्व जिल्हाधिकारी, सर्व स्थानिक स्वराज्य संस्था, सर्व शासकीय-निमशासकीय कार्यालये यांना योग्य त्या सविस्तर सूचना निर्गमित कराव्यात.

४. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ वे जयंती वर्ष हे "समता व सामाजिक न्याय वर्ष" म्हणून साजरे करण्याचा निर्णय दिनांक ९ ऑक्टोबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला असून, त्या अंतर्गत राज्यात विविध कार्यक्रम / उपक्रम राबविण्यात येत आहेत.

५. "संविधान दिन" या कार्यक्रमात राज्यातील सर्व प्राथमिक / माध्यमिक शाळेतील व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांचा सहभाग घेऊन संविधानाच्या उद्देशिकेचे समुह वाचन करण्याबाबत शालेय शिक्षण विभागाने व उच्च तंत्र व शिक्षण विभागाने योग्य त्या सूचना सर्व संबधितांना द्याव्यात.

६. राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्था अंतर्गत सर्व जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायती यांच्यामार्फत जनसमुदायाकडून संविधानाच्या उद्देशिकेचे समुह वाचन करण्याबाबत च्या सूचना ग्रामविकास विभागाने सर्व जिल्हा परिषदांना द्याव्यात. तसेच दिनांक २६नोव्हेंबर,२०१५ या संविधान दिनाच्या दिवशी सर्व ग्रामपंचायतस्तरावर विशेष ग्रामसभा आयोजित करण्यात येवुन त्यावेळी संविधानाच्या उद्देशिकेचे वाचन करण्याबाबत आवश्यक त्या सूचना देण्यात याव्यात.

७. महानगरपालिका व नगरपालिका/ नगर परिषदा यांच्यामार्फत जनसमुदायाकडून संविधानाच्या उद्देशिकेचे समुह वाचन करण्याबाबत नगर विकास विभागाने सर्व संबंधित महानगर पालिका, नगरपालिका/नगर परिषदांना सूचना द्याव्यात.

८. राज्यातील सर्व पोलीस स्टेशन इत्यादी ठिकाणी "संविधान दिन" साजरा करावयाचा असून संबंधित पोलीस स्टेशनमध्ये सदरचा कार्यक्रम राबविण्याबाबत गृह विभागाने सविस्तर सूचना सर्व संबंधितांना द्याव्यात.

९. सर्व विद्यापीठामार्फत "संविधान दिना" निमित्त संविधानाचा उद्देशिकेच्या वाचनाचा कार्यक्रम घेण्याबाबत सर्व विद्यापीठे व त्यांच्या अंतर्गत सर्व महाविद्यालयांना उच्च व तंत्रशिक्षण विभागाने सूचना द्याव्यात. तसेच नागपूर विद्यापीठ व त्यांच्या अधिनस्थ महाविद्यालयांना नागपूर येथील मुख्य शासकीय कार्यक्रमामध्ये सहभागी होण्याबाबत उच्च व तंत्रशिक्षण विभागाने आवश्यक त्या सूचना द्याव्यात.

१०. संविधान दिनाचा मुख्य शासकीय कार्यक्रम नागपूर येथे मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात येणार आहे. या कार्यक्रमासाठी केंद्रीय मंत्री, खासदार, नागपूर जिल्ह्याचे पालकमंत्री, समाजिक न्याय मंत्री, सामाजिक न्याय राज्यमंत्री, आमदार, महापौर, जिल्हा परिषद अध्यक्ष, स्थानिक लोकप्रतिनिधी व इतर मान्यवर उपस्थित राहणार असून शाळा / कॉलेज मधील

विद्यार्थी, एन.एस.एस., स्काऊट व गाईड, आश्रमशाळेतील विद्यार्थी व स्वयंसेवी संस्थांचा मोठ्या प्रमाणावर सहभाग असणार आहे.

११. नागपूर येथे आयोजित करण्यात येणाऱ्या "संविधान दिनाच्या" मुख्य शासकीय कार्यक्रमाची सर्वसाधारण रुपरेषा पुढीलप्रमाणे राहील :-

- स्थळ :- यशवंत स्टेडीयम, धंतोली, नागपूर,
- वेळ :- सकाळी ९.०० वा.
- अपेक्षित सहभाग :- १,२५,००० इतक्या जनसमुदायाकडून भारतीय संविधानाची प्रस्तावना /उद्देशिकांचे समुह वाचन करावे, या मध्ये मोठ्या प्रमाणात विद्यार्थ्यांचा सहभाग घ्यावा,
- संविधान दिनी लोककलावंतांद्वारे प्रबोधनाचा कार्यक्रम आयोजित करावा,
- या कार्यक्रमासाठी रेडिओ, वृत्तपत्रे, टि.व्ही., होर्डींग्ज, सोशल मिडीया, इत्यादीद्वारे व्यापक प्रसिध्दी /जाहिरात करुन जास्तीत जास्त लोकांचा सहभाग सुनिश्चित करावा,
- या कार्यक्रमासाठी मा.पालकमंत्री, मा. खासदार, मा. आमदार, मा. महापौर, मा. जिल्हा परिषद अध्यक्ष व इतर निर्वाचित लोकप्रतिनिधी व इतर मान्यवरांना आमंत्रित करुन त्याबाबत पूर्व सूचना देण्यात यावी.
- जिल्हाधिकारी, नागपूर यांचे अध्यक्षतेखाली संयोजन समितीचे गठन करावे व या संयोजन समितीने नागपूर येथील "संविधान दिनाच्या" कार्यक्रमाचे नियोजन करावे.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१५११०७१५०००३९९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2015.11.07 15:47:37 +05'30'

(दि. रा. डिंगळे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

२. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानमंडळ, मुंबई

४. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई

५. विभागीय आयुक्त, सर्व प्रादेशिक विभाग,

६. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे

७. आयुक्त, सर्व महानगर पालिका

८. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद

९. आयुक्त, समाजकल्याण, पुणे

१०.महासंचालक, बार्टी, पुणे

११.प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व प्रादेशिक विभाग

१२.सहायक आयुक्त, समाजकल्याण, सर्व जिल्हे

१३.जिल्हा समाजकल्याण अधिकारी, सर्व जिल्हा परिषद

१४.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,

१५.सर्व सह/उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६.निवडनस्ती/बांधकामे.